सेवापूर्व शिक्षण संस्था, औरंगाबाद या संस्थेच्या नियामक मंडळावर अध्यक्ष व अशासकीय सदस्यांच्या नियुक्तीकरीता निकष विहित करणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग,**
**शासन निर्णय क्र. : एसपीआय-२०२०/प्र.क्र.४४/का. २८**
**मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२**
**दिनांक : १० जानेवारी, २०२२.**

**वाचा:-** १) सामान्य प्रशासन विभाग शासन निर्णय क्रमांक एसएसबी-२०७६/७८९०/२८, दि.१३.०८.१९७६.
२)सामान्य प्रशासन विभाग शासन निर्णय क्र.एसपीआय-२०१३/(प्र.क्र.८७/१३)/२८, दि.३१.०८.२०१५.
३) सामान्य प्रशासन विभाग शासन निर्णय क्र.एसपीआय-२०२०/प्र.क्र. ४४/२८, दि.०८.०७.२०२०.
४) सामान्य प्रशासन विभाग शासन शुध्दीपत्रक क्र.एसपीआय-२०२०/प्र.क्र. ४४/२८, दि.२५.०९.२०२०.
५) सामान्य प्रशासन विभाग शासन निर्णय क्र.एसपीआय-२०१३/प्र.क्र. ४४/२८, दि.०४.०६.२०२१.
६) संचालक,सैनिकी सेवापूर्व शिक्षण संस्था, औरंगाबाद यांचे पत्र क्र. ३००२/एसपीआय/२०२०/१४१, दि.२३ ऑगस्ट,२०२१.

**प्रस्तावना-**

सामान्य प्रशासन विभाग (माजी सैनिक कल्याण)च्या अधिनस्त मुलांची सैनिकी सेवापूर्व शिक्षण संस्था, औरंगाबाद कार्यरत आहे. या संस्थेमध्ये प्रवेश घेऊ इच्छिणाऱ्या विद्यार्थ्यांची निवड करण्यासाठी दि.१३.०८.१९७६ च्या शासन निर्णयान्वये "सैनिकी सेवापूर्व शिक्षण संस्था, औरंगाबाद नियामक मंडळाची स्थापना करण्यात आली.तद्नंतर वेळोवेळी नियामक मंडळाची पुर्नरचना करण्यात आली.सदर मंडळावर अध्यक्ष व अशासकीय सदस्यांच्या नियुक्तीकरीता निकष विहीत करण्याचा प्रस्ताव संचालक,सैनिकी सेवापूर्व शिक्षण संस्था, औरंगाबाद यांच्या संदर्भाधिन क्रमांक ६ येथे नमूद केलेल्या पत्रान्वये प्राप्त झाला आहे.त्या अनुषंगाने नियामक मंडळावर अध्यक्ष व अशासकीय सदस्यांच्या नियुक्तीकरीता निकष विहित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय -:**

सैनिकी सेवापूर्व शिक्षण संस्था, औरंगाबाद या संस्थेत प्रवेश देण्यासाठी विद्यार्थ्यांची निवड करण्यासंदर्भात कार्यपध्दती ठरविणे व शासनाने नियामक मंडळाकडे सोपविलेली कामे पार पाडण्यासाठी नियामक मंडळावर अध्यक्ष व अशासकीय सदस्यांच्या नियुक्तीकरीता शिफारस करण्यासाठी खालीलप्रमाणे निकष विहित करण्यात येत आहेत:-

१.सैनिकी सेवापूर्व शिक्षण संस्था,औरंगाबाद नियामक मंडळावर नियुक्त होणारे अध्यक्ष लेफ्टनंट जनरल (निवृत्त) किंवा समकक्ष दर्जाचे असावेत.

२.कार्यरत असलेल्या नियामक मंडळातील सदस्यांमधील सर्वात ज्येष्ठ व अनुभवी सदस्यांचे नाव सर्वसाधारणपणे नियामक मंडळाच्या अध्यक्ष या पदाकरीता ग्राहय धरण्यात यावे.

३.नियामक मंडळावरील सदस्य/अध्यक्ष हे संरक्षण दलातील प्रशिक्षण संदर्भातील संस्थांमध्ये काम केलेले असावेत.

४.नियामक मंडळावर किमान ३ आणि जास्तीत जास्त ६ सदस्य असावेत. मंडळावरील सदस्य हे भारतीय सैन्य दलाच्या भूदल/नौदल/वायुदल यामधील प्रत्येकी किमान एक याप्रमाणे असावेत. सदर सदस्यांची रँक ही मेजर जनरल,ब्रिगेडीयर किंवा समकक्ष असावी.

५.नियामक मंडळावर नियुक्त करावयाचे अध्यक्ष व सदस्यांचे वय ७५ वर्षांपेक्षा कमी असावे.सदर मंडळावर नियुक्त होणारे अध्यक्ष व सदस्य हे खाजगी संरक्षण प्रशिक्षण देणाऱ्या किंवा तत्सम संस्थेशी निगडीत नसावेत.

६.नियामक मंडळात रिक्त झालेल्या पदावर नियुक्त होवू इच्छिणाऱ्या सदस्यांकडे(अध्यक्ष व सदस्य) सर्व्हिस सिलेक्शन बोर्ड (एसएसबी) चा अनुभव असल्यांस त्यांच्या नियुक्तीचा प्राधान्याने विचार करण्यात यावा.

७.नियामक मंडळावर पूर्वी काम केलेल्या सदस्याचा विचार प्राधान्याने करण्यात यावा.तसेच संस्थेची व नियामक मंडळाची कार्यपध्दती विचारात घेवून संस्था व नियामक मंडळ यांनी शिफारस केलेल्या अधिकाऱ्यांचा प्राथमिकतेने विचार करण्यात यावा.

२. नियामक मंडळाच्या जबाबदाऱ्या पुढीलप्रमाणे आहेत:-

अ) दरवर्षी होणाऱ्या चयनप्रक्रियेची कार्यपध्दती निश्चित करणे.

आ) लेखी परिक्षेत उत्तीर्ण झालेल्या विद्यार्थ्यांच्या मुलाखती आयोजित करणे.

इ) अंतिम निवड यादी संस्थेला सोपविणे.

ई) संस्थेतील छात्रांना आवश्यकतेनुसार मार्गदर्शन करणे.

उ) नियामक मंडळाच्या बैठकीला उपस्थित राहणे.

ऊ) संरक्षण दलात होणाऱ्या फेरबदलांचा आढावा घेत राहणे.

३. हा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक क्रमांक २०२२०१११६२९१३८८०७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Shivaji gulabrao gore

Digitally signed by Shivaji gulabrao gore
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=GENERAL ADMINISTRATION DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=5a914ec7d72351a68d9f12e80317d7512bf6f19c34fee2557e3b3c882cce6f57, pseudonym=FBF0A6AA972F003B5B0C7967AD7B6A3C4FA38DC8, serialNumber=0FB38126D364A4D9F8873B7BC48B4369F1657CA258FC9C6479A27B4D539F409B, cn=Shivaji gulabrao gore
Date: 2022.01.12 11:37:21 +05'30'

**( शिवाजी गोरे )**

**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति :-**

१. मा.मुख्यमंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
२. मा.मंत्री (माजी सैनिक कल्याण) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. मा.राज्यमंत्री (माजी सैनिक कल्याण) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
४. संचालक, सैनिकी सेवापूर्व शिक्षण संस्था, औरंगाबाद.
५. महासंचालक,माहिती व जनसंपर्क संचालनालय,मुंबई.
६. प्र.स. व वि.चौ.अ.(१) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
७. निवड नस्ती (२ प्रती).